महाराष्ट्र राज्यात वन वणवा आटोक्यात आणण्याच्या आधुनिक पध्दती.
सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

## शासन निर्णय क्र. एफडीसी-२०१८/प्र.क्र.१८१/फ-५.

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०१८.

संदर्भ: १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/४/२०१८.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३४/३३३/२०१८-१९, दिनांक. २९ मे, २०१८.

**प्रस्तावना:**

भारत सरकार आणि अन्न व कृषि संघटना संयुक्त राष्ट्र विकास कार्यक्रम योजनेद्वारे महाराष्ट्र राज्यातील वनवणवा आटोक्यात आणण्यासाठी व बहुमुल्य वनसंपदेचे अग्निपासून रक्षण करण्यासाठी आधुनिक वनवणवा प्रतिबंधक प्रकल्प १९८४ पासून राबविण्यात येत आहे. महाराष्ट्र वन विकास महामंडळ हा प्रकल्प सन १९८४-८५ पासून शासनाचा अभिकर्ता म्हणून राबवित आहे.

या प्रकल्पांतर्गत वनाचे अग्निपासून आधुनिक पध्दतीने संरक्षण करण्यात येत असुन मुख्यत्वेकरुन मोठया प्रमाणात लागवड केलेल्या साग रोपवनाचे रक्षण होत आहे. या प्रकल्पामुळे वनवणव्याच्या घटना व व्याप्ती यात लक्षणीय घट झाल्याचे दृष्टोत्पतीस येत आहे. योजनेचे महत्व व फलश्रुती विचारात घेता या प्रकल्पांतर्गत करावयाचे काम सन २०१८-१९ मध्ये चालू ठेवणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :**

वन विकास महामंडळामार्फत राज्य शासनाचा अभिकर्ता म्हणून राबविण्यात येत असलेल्या आधुनिक वन वणवा प्रकल्पाअंतर्गत करावयाच्या कामाच्या अनुषंगाने योजनेच्या स्वरुपात / व्याप्तीमध्ये बदल नसल्याने, सन २०१८-१९ या वर्षाकरिता महाराष्ट्र राज्यातील वनवणवा आटोक्यात आणण्यासाठी व बहुमुल्य वनसंपदेचे अग्निपासून रक्षण करण्यासाठी आधुनिक वनवणवा प्रतिबंधक प्रकल्पांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रु.२५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक ०२/०४/२०१८ च्या परिपत्रकानुसार योजनांतर्गत व योजनेत्तर योजनांकरिता अर्थसंकल्पीत निधीच्या ७०% निधी वितरीत करण्यास प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सन २०१८-१९ करिता

वनसंरक्षण आग विझविण्याच्या आधुनिक पध्दती या योजनेसाठी रु.१७५.०० लक्ष (रुपये एक कोटी पंचाहत्तर लक्ष मात्र) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च विहित कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्ची टाकण्यात यावा. यामध्ये कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर खर्च प्रधानशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, मागणी क्रमांक सी-७, १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना सहाय्य (००), (००)(०१) महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित यांस देय असलेला अभिकरण खर्च (२४०६ ०६६८) (योजनेत्तर), ५० इतर खर्च या लेखाशिर्षाअंतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय विभागाचे परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/४/२०१८अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०११५२८४४२५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.08.01 15:33:31 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने), महाराष्ट्र शासन.

**प्रति-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थ संकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. महालेखपाल (१ व २) (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
६. कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. कक्ष अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. कक्ष अधिकारी (फ-२), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. निवड नस्ती (फ-५), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.